इंद्रायणी मनोविकास संस्था, अकोला संचलित इंद्रायणी मतिमंद मुलांची शाळा, अकोला अनुदानित दिव्यांग विशेष शाळेचे व्यवस्थापन श्री.राष्ट्रसंत शिक्षण संस्कृती ज्ञानपीठ, मासोद, ता.चांदूरबाजार, जि.अमरावती या संस्थेस हस्तांतरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. इडीडी-२०२३/प्र.क्र.११५/दि.क.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ३० जुलै, २०२४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इडीडी-२०१७/ प्र.क्र.०६/अ.क.१, दि.१६ सप्टेंबर, २०१७.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इडीडी-२०१७/ प्र.क्र.०६/अ.क.१, दि.१५ फेब्रुवारी, २०१९
३) महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (व्यवस्थापन हस्तांतर) अधिनियम, १९७१.

**प्रस्तावना :-**

इंद्रायणी मनोविकास संस्था, अकोला संचलित इंद्रायणी मतिमंद मुलांची शाळा, जठारपेठ, अकोला या अनुदानित शाळेचे नोंदणी प्रमाणपत्र क्र.०१७१, दि.१२.१२.१९९८ अन्वये ४० अनिवासी विद्यार्थी संख्येवर प्रदान केलेल्या नोंदणी प्रमाणपत्राची वैधता दि.३१.०३.२०२० पर्यंत होती. सदर शाळेची अनुज्ञप्ती रद्द केल्याच्या आयुक्तालयाच्या दि.१६.०६.२०२० रोजीच्या आदेशाविरुध्द दाखल अपीलावर तत्कालीन मा.मंत्री (सा.न्या.) महोदयांकडे सुनावणी होऊन सदर दि.०३.१२.२०२१ रोजी पारीत आदेशान्वये सदर शाळा सुरु करण्यासाठी एक संधी देण्यात आली. मा.मंत्री महोदयांच्या सदर आदेशाच्या अनुषंगाने इंद्रायणी मनोविकास संस्था, अकोला या संस्थेकडून उक्त शाळा चालविणे अपेक्षित होते. परंतू सदर संस्थेने शाळा मुदतीत चालू न केल्याने शाळेतील कर्मचाऱ्यांनी वेतनाबाबत तक्रारी केल्याने जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जि.प.अमरावती यांनी सदर शाळेवर प्रशासक नियुक्त करण्याची शिफारस आयुक्तालयास केली. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी दि.२६.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये इंद्रायणी मनोविकास संस्था, अकोला संचलित इंद्रायणी मतिमंद मुलांची शाळा, अकोला अनुदानित दिव्यांग विशेष शाळेचे व्यवस्थापन श्री.राष्ट्रसंत शिक्षण संस्कृती ज्ञानपीठ, मासोद, ता.चांदूरबाजार, जि.अमरावती या संस्थेस हस्तांतरीत करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेस्तव सादर केला. त्यानुषंगाने इंद्रायणी मनोविकास संस्था, अकोला संचलित इंद्रायणी मतिमंद मुलांची शाळा, अकोला अनुदानित दिव्यांग विशेष शाळेचे व्यवस्थापन श्री.राष्ट्रसंत शिक्षण संस्कृती ज्ञानपीठ, मासोद, ता.चांदूरबाजार, जि.अमरावती या संस्थेस हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

इंद्रायणी मनोविकास संस्था, अकोला संचलित इंद्रायणी मतिमंद मुलांची शाळा, अकोला अनुदानित दिव्यांग विशेष शाळेचे व्यवस्थापन श्री.राष्ट्रसंत शिक्षण संस्कृती ज्ञानपीठ, मासोद, ता.चांदूरबाजार, जि.अमरावती या संस्थेस हस्तांतरीत करण्यास या शासन निर्णयान्वये एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर संस्थेला दिव्यांग विशेष शाळा मान्यता व अनुदान या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

३. सदर विशेष शाळेच्या व्यवस्थापन हस्तांतरणाबाबतची सर्व प्रक्रिया तीन महिन्याच्या कालावधीत पूर्ण करावी व त्याबाबतचा अहवाल आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी शासनास सादर करावा.

४. व्यवस्थापन हस्तांतरणाचे आदेश पारित झाल्यानंतर ३० दिवसांच्या आत सदर संस्थेस दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ अन्वये सक्षम प्राधिकारी तथा आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांच्याकडून नोंदणी प्रमाणपत्र करुन घेणे बंधनकारक राहील.

५. सदर विशेष शाळेच्या व्यवस्थापन हस्तांतरणाचा सर्व खर्च संबधीत संस्थेला करावा लागेल. सदर खर्चाची प्रतिपूर्ती देय असणार नाही.

६. विषयांकित शाळेचे व्यवस्थापन हस्तांतर करुन घेणारी संस्था ही मुळ शाळेतील मान्यता प्राप्त व कार्यरत सर्व कर्मचाऱ्यांना प्रस्तावित हस्तांतरणानंतर त्यांच्या मुळ पदावर सामावून घेईल.

७. विषयांकित शाळेचे व्यवस्थापन हस्तांतर करुन घेणारी संस्था ही सदरची शाळा मुळ ठिकाणी चालवेल.

८. सदर शासन निर्णय मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७३१११२६५२३४३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPT.,
2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9AB69D6945F8950A9525831F8AE9726BE295D17576E78D19FA8F6CB952BB04A0, cn=VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2024.07.31 11:41:50 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) सचिव (दिव्यांग कल्याण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,अमरावती.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद-अकोला/अमरावती.

६) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हापरिषद-अकोला/अमरावती.

७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

८) जिल्हा कोषाधिकारी, अकोला/अमरावती.

९) अध्यक्ष / सचिव, इंद्रायणी मनोविकास संस्था, अकोला.

१०) अध्यक्ष / सचिव, श्री.राष्ट्रसंत शिक्षण संस्कृती ज्ञानपीठ, मासोद, ता.चांदूरबाजार, जि.अमरावती.

११) निवडनस्ती (दिव्यांग कल्याण -१)